वितरण आदेश क्र.३

“सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती योजनेचा निधी वितरीत करण्याबाबत”

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: शिवृत्ती-२०२३/प्र.क्र.५८/शिक्षण-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १८जुलै, २०२३

**संदर्भ** :- (१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३
(२) इतर मागास बहुजन कल्याण विभागाचे शासन निर्णय समक्रमांक दिनांक ३.०५.२०२३ व दिनांक १९.०६.२०२३
(३) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचे पत्र क्रमांक इ.मा.ब.क.सं/ २०२२-२३/पुणे/१६२८, दिनांक १३.०७.२०२३

**प्रस्तावना:-**

विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग या घटकांच्या मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्तीसाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीय तरतुदीनुसार मंजूर करण्यात आलेल्या निधीपैकी वित्त विभागाकडून ३४% निधी बीम्स प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या रु.४८८.८६९० कोटी निधीपैकी संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये रु.४०१.०४ कोटी निधी वितरीत करण्यात आला आहे. तसेच अन्य प्रकरणी ४.२५ कोटी निधी वितरीत करण्यात आला असून सद्य:स्थितीत उपलब्ध निधीपैकी एकूण ४०५.२९ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. वितरीत निधीपैकी रु.३९८.७१४८ कोटी निधी खर्च झाला आहे.

उर्वरित निधीतून संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी महाडीबीटी पोर्टलवरील नोंदणीकृत अर्जांची शिष्यवृत्ती अदा करण्यासाठी संदर्भ क्रमांक ३ येथील पत्रान्वये मागणी केल्यानुसार निधीचे वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग व इतर मागासवर्ग या प्रवर्गातील विद्यार्थ्यांना मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती व फ्रिशिप योजनेबाबत ३४- शिष्यवृत्ती व विद्यावेतन या उद्दिष्टांतर्गत प्रलंबित असलेली शिष्यवृत्ती / फ्रीशीप अदा करण्यासाठी अर्थसंकल्पीय तरतुदीनुसार मंजूर झालेल्या निधीपैकी ३४% निधी बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्यानुषंगाने खालील विवरणपत्रात नमूद लेखाशिर्षाकरिता एकूण रु.७३,७१,४०,०००/- (रुपये त्र्याहत्तर कोटी एकाहत्तर लाख चाळीस हजार फक्त ) इतका निधी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना वितरीत करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे:-

(रु.कोटीत)

| क्र. | योजनेचे नाव | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीय तरतूद | वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर उपलब्ध केलेला निधी | यापूर्वी वितरीत केलेला निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | राज्य शासनाच्या मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्त्या (विजाभज) | २२२५E८८४ | १५९.८००० | १३५.११४१ | १३४.०१५९ | २२.००० |
| २ | औद्योगिक प्रशिक्षण संस्थांतील प्रशिक्षणार्थ्यांना विद्यावेतन कार्यक्रम | २२२५ई९०१ | २.६६९० | २.३५५० | २.३५५० | ०.३१४० |
| ३ | शिक्षण शुल्काचे व परिक्षा शुल्काचे प्रदान (विजाभज) | २२२५E९१९ | ६८.०००० | ५४.८००८ | ५३.५२८१ | १२.००० |
| ४ | व्यावसायिक पाठयक्रमाशी संलग्न असलेल्या वसतिगृहा मधील विजाभज विद्यार्थ्यांना निर्वाह भत्ता | २२२५E९३७ | १.७००० | १.५००० | १.४९९९ | ०.२००० |
| ५ | विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती | २२२५E९४६ | ३४.०००० | २४.३४०६ | २४.१४६४ | ८.००० |
| ६ | इयत्ता ११ व १२ वी च्या विजाभज व विमाप्र विद्यार्थ्यांना राजर्षी छत्रपती शाहू महाराज गुणवत्तापूर्ण शिष्यवृत्ती | २२२५ई९५५ | १.७००० | १.५००० | १.५००० | ०.२००० |
| ७ | इमाव विद्यार्थ्यांसाठी शिक्षण शुल्काचे व परिक्षा शुल्काचे प्रदाने | २२२५E९७३ | ६८.०००० | ५५.७८३० | ५३.२४४१ | ११.०००० |
| ८ | इमाव विद्यार्थ्यांसाठी शिक्षण शुल्काचे व परिक्षा शुल्काचे प्रदाने | २२२५F००२ | १५३.०००० | १२९.८९९२ | १२८.५५२३ | २०.००० |
| | एकूण | | **१४३७.८५००** | **४८८.८६९०** | **४०५.२९२७** | **७३.७१४०** |

२. सदर योजनेकरिता संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे हे नियंत्रक अधिकारी राहतील. नियंत्रक अधिकारी यांनी उपरोक्त प्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनातून खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर खर्चाचे विवरण (जिल्हानिहाय खर्च/लाभार्थी संख्या) व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

३. योजनेंतर्गत चालू आर्थिक वर्षातील खर्चाचे तसेच मागील वर्षातील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे नियंत्रक अधिकारी यांनी तपासण्याच्या आधिन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील. तसेच वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका तसेच वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकातील अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करतांना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

४. नियंत्रक अधिकारी यांनी निधी खर्च करताना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकामधील अटींची पूर्तता झाली असल्याची खातरजमा करुन निधी वितरीत करावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ च्या परिपत्रकान्वये दिलेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०७२०१३१८१५६०३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDHARTH
AMRUTRAO
ZALTE

Digitally signed by SIDDHARTH AMRUTRAO ZALTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=dc54b49c6f5c903027053476b3a6ef50b46ff44a7e8b820fef7bfdd100c56194, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8EA004AE581D6FF06989D826800FF7528B6FD6418579108C011AE21079E9E0C9, cn=SIDDHARTH AMRUTRAO ZALTE
Date: 2023.07.20 13:19:14 +05'30'

**( सिध्दार्थ अ. झाल्टे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव.
२. मा.अपर मुख्य सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण /सर्व प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण
९. सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण/सर्व सहाय्यक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. निवडनस्ती (शिक्षण १)